**सी.बी.एस.ई. (C.B.S.E.), सी.आय.एस.सी.ई. (C.I.S.C.E.), आय.बी. (I.B.), आय.जी.सी.एस.ई. (I.G.C.S.E.), सी.आय.ई. (C.I.E.) इत्यादी देशातील व विदेशातील मंडळाच्या अभ्यासक्रमाशी संलग्नित होऊ इच्छिणाऱ्या शाळांना ना-हरकत प्रमाणपत्र (No Objection Certificate) देण्याबाबतची कार्यपध्द्ती.**

# महाराष्ट्र शासन

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - नाहप्र ४०१७/प्र.क्र.०१/२०/एस.एम.-३**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ०४ मार्च, २०२०

**वाचा:-** १) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र. नाहप्र २००९/(६६३/०९)/माशि-१, दिनांक २०.०६.२०१२.
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग अधिसूचना क्र. संकीर्ण २०११/प्र.क्र.२३९/११/माशि-१, दिनांक १९.०१.२०१३.

**प्रस्तावना :**

देशातील व विदेशातील, सी.बी.एस.ई. (Central Board of Secondary Education), सी.आय.एस.सी.ई. (Council for the Indian School Certificate Examination), आय.बी. (International Baccalaureate), आय.जी.सी.एस.ई. (International General Certificate of Secondary Education), सी.आय.ई. (Cambridge International Examination) इत्यादी मंडळाच्या अभ्यासक्रमाशी संलग्नित होऊ इच्छिणाऱ्या राज्यातील शाळांना कायम विना अनुदान तत्वावर परवानगी व ना-हरकत प्रमाणपत्र (No Objection Certificate) देण्याबाबतची कार्यपध्दती संदर्भाधीन क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आली आहे. त्यानंतर राज्यातील शाळांना परवानगी संदर्भात "महाराष्ट्र स्वयं-अर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२", दिनांक १९.०१.२०१३ पासून लागू झाला आहे. त्यानुसार राज्यात नवीन शाळा सुरु करण्यास अथवा विद्यमान शाळेचा दर्जावाढ करण्यासाठी सदर अधिनियमातील तरतूदीनुसार शासनाची परवानगी घेणे आवश्यक आहे. त्यानंतर संबंधित शाळेस राज्यातील, देशातील अथवा विदेशातील कोणत्याही मंडळास संलग्नता घेण्यासाठी शासनाचे ना-हरकत प्रमाणपत्र घेणे आवश्यक आहे. याअनुषंगाने संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयात सुधारणा करुन, देशातील व विदेशातील मंडळाच्या अभ्यासक्रमाशी संलग्नित होऊ इच्छिणाऱ्या शाळांना ना-हरकत प्रमाणपत्र (No Objection Certificate) देण्याच्या कार्यपध्दती संदर्भात आदेश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

देशातील व विदेशातील, सी.बी.एस.ई. (C.B.S.E.), सी.आय.एस.सी.ई. (C.I.S.C.E.), आय.बी. (I.B.), आय.जी.सी.एस.ई. (I.G.C.S.E.), सी.आय.ई. (C.I.E.) इत्यादी मंडळाच्या अभ्यासक्रमाशी संलग्नित होऊ इच्छिणाऱ्या राज्यातील शाळांना ना-हरकत प्रमाणपत्र (No Objection Certificate) देण्यासंदर्भात तसेच, यापूर्वी दिलेल्या ना-हरकत प्रमाणपत्राचे नूतनीकरण करण्यासंदर्भात कार्यपध्दती व त्यासाठीच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील :-

१) "महाराष्ट्र स्वयं-अर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२" नुसार शाळेस अथवा विद्यमान शाळेस दर्जावाढीस शासनाची परवानगी घेणे आवश्यक राहील.

२) देशातील व विदेशातील, सी.बी.एस.ई. (C.B.S.E.), सी.आय.एस.सी.ई. (C.I.S.C.E.), आय.बी. (I.B.), आय.जी.सी.एस.ई. (I.G.C.S.E.), सी.आय.ई. (C.I.E.) इत्यादी मंडळाच्या अभ्यासक्रमाशी शाळेस संलग्नित करण्यासाठी संबंधित संस्था/ कंपनीस "परिशिष्ट-अ" नुसार शासनाकडे प्रस्ताव सादर करता येईल.

३) सदर प्रस्तावाची छाननी करुन शाळा, संबंधित मंडळाने विहीत केलेले नियम, निकष, अटी व शर्तींची पूर्तता करीत असल्यास, शाळेस संबंधित मंडळ संलग्नतेसाठी ना-हरकत प्रमाणपत्र देण्याबाबत शासन निर्णय घेईल.

४) सदर ना-हरकत प्रमाणपत्र, निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून तीन वर्षाकरीता वैध राहील. त्या कालावधीत शाळेने संबंधित मंडळाचे संलग्नीकरण प्राप्त करुन घेणे आवश्यक राहील.

५) शाळेला सदर कालावधीत संबंधित मंडळाचे कायम अथवा तात्पुरते संलग्नीकरण मिळाले नाही आणि शाळेने ना-हरकत प्रमाणपत्राचे नुतनीकरण करुन देण्याबाबत परिच्छेद क्रमांक (२) नुसार शासनास प्रस्ताव सादर केल्यास शाळेस ना-हरकत प्रमाणपत्राचे नुतनीकरण देण्याबाबत शासन निर्णय घेईल.

६) शाळेने ना-हरकत प्रमाणपत्र मिळाल्यानंतर, माहितीकरीता दर्शनी भागावर **"प्रस्तावित (सी.बी.एस.ई./ सी.आय.एस.सी.ई./आय.बी./ आय.जी.सी.एस. ई./ सी.आय.ई.) शाळा"** असा फलक लावणे व त्यावर ना-हरकत प्रमाणपत्राचा क्रमांक नमूद करणे आवश्यक राहील.

७) संबंधित मंडळाचे संलग्नीकरण मिळाल्यानंतर **("सी.बी.एस.ई./ सी.आय.एस.सी.ई./ आय.बी./आय.जी.सी.एस. ई./सी.आय.ई.) मंडळाशी संलग्नीत शाळा"** असा फलक लावणे व त्यावर संलग्नीकरणाचा क्रमांक नमूद करणे आवश्यक राहील.

८) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम, २००९ मधील तरतूदी तसेच राज्य शासनाने राजपत्राव्दारे सदर अधिनियमाखाली विहीत केलेले नियम व आदेश, सी.बी.एस.ई.

(C.B.S.E.), सी.आय.एस.सी.ई. (C.I.S.C.E.), आय.बी. (I.B.), आय.जी.सी.एस.ई. (I.G.C.S.E.), सी.आय.ई. (C.I.E.) इत्यादी मंडळांशी संलंग्नीत सर्व शाळांना लागू राहतील.

९) सी.बी.एस.ई. (C.B.S.E.), सी.आय.एस.सी.ई. (C.I.S.C.E.), आय.बी. (I.B.), आय.जी.सी.एस.ई. (I.G.C.S.E.), सी.आय.ई. (C.I.E.) यातील कोणत्याही मंडळाशी संलंग्नीत राज्यातील सर्व शाळांमध्ये इयत्ता दहावी पर्यंत मराठी भाषा हा विषय शिकविणे अनिवार्य राहील.

१०) राज्य शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या अटी व शर्तींची सदर शाळांनी पूर्तता न केल्यास उक्त ना-हरकत प्रमाणपत्र रद्द करण्याचे अधिकार राज्य शासनास राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर प्रसिद्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२००३०४१७३३२१२५२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2020.03.04 17:38:15 +05'30'

**( इ.मु. काझी )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा/ विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६. सर्व विधानसभा/ विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. संचालक, माध्य. व उच्च माध्य. शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक), सर्व जिल्हा परिषद.
१४. शिक्षण निरीक्षक, दक्षिण/ उत्तर/ पश्चिम विभाग, मुंबई.
१५. निवड नस्ती (एस.एम.-३)

# परिशिष्ट - अ

शासन निर्णय क्र. शासन निर्णय क्रमांक नाहप्र ४०१७/प्र.क्र.०१/२०/एस.एम.-३, दिनांक ०४ मार्च, २०२० अनुसार मान्यताप्राप्त शाळांना C.B.S.E./C.I.S.C.E./I.G.C.S.E./I.B./C.I.E. व अन्य मंडळाशी संलंग्नित होण्याकरीता ना-हरकत प्रमाणपत्र मिळण्यासाठी सादर करावयाचा प्रस्तावाचा नमुना

| अ. क्र. | तपशील | माहिती | सादर करावयाची कागदपत्रे |
|---|---|---|---|
| १ | संस्थेचे नाव व पुर्ण पत्ता/<br>कंपनीचे नाव व पुर्ण पत्ता | | |
| २ | शाळेचे नाव व पुर्ण पत्ता | | |
| ३ | ज्या वर्गांकरीता ना-हरकत प्रमाणपत्र हवे आहे ते वर्ग | | |
| ४ | शाळा मान्यता आदेश | | शाळेस परवानगीचा शासन निर्णय/ आदेश, शिक्षणाधिकाऱ्यांचे प्रथम मान्यतेचे पत्र, विभागीय उपसंचालकांचे मान्यतेबाबतचे पत्र. |
| ५ | बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क नियम, २०११ मधील नियम ११, पोटनियम (४) अन्वये शाळेला मान्यता देण्यात आली आहे का ? | | नमुना-२ मधील मान्यता प्रमाणपत्र (संपुर्ण तपशील नमूद केलेले) |
| ६ | शाळेचा U-DISE क्रमांक | | स्कुल रिपोर्ट कार्ड ची प्रत |
| ७ | अ) शाळेत प्रवेशित विद्यार्थ्यांची एकुण संख्या<br>ब) त्यापैकी आधार नोंदणी करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांची संख्या | | |
| ८ | विद्यार्थ्यांकडून घेण्यात येणारे शैक्षणिक शुल्क | | |
| ९ | राज्य मंडळाशी संलग्नित असलेली शाळा अन्य मंडळाशी संलग्नित करावयाची असल्यास | | १) अन्य मंडळाशी संलग्नित होण्यास हरकत नसल्यासंदर्भात पालक-शिक्षक संघाचा ठराव (PTA),<br>२) अन्य मंडळाचा अभ्यासक्रम टप्प्याटप्प्याने लागू करण्यात येईल याबाबत संस्थेचे अध्यक्ष/ सचिव यांचे |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | रु. १००/- मुल्याच्या मुद्रांकावर (Stamp Paper) प्रतिज्ञापत्र<br>३) सर्व पालकांचे संमतीपत्र |
| १० | अ) संस्थेचा सोसायटी अधिनियम १८६० (१८६० चा २१) नुसार नोंदणीचे प्रमाणपत्र<br>किंवा<br>ब) मुंबई सार्वजनिक विश्वस्त व्यवस्था अधिनियम १९५० (१९५० चा मुंबई २४) नुसार नोंदणी केलेला नोंदणीचे प्रमाणपत्र<br>किंवा<br>क) कंपनी कायदा, २०१३ च्या कलम ८ खाली नोंदणीचे प्रमाणपत्र (लायसन्स) | | संस्था नोंदणी प्रमाणपत्र |
| ११ | संस्थेची घटना/ कंपनीचे मेमोरेंडम ऑफ असोसिएशन | | संस्थेची प्रमाणित घटनेची प्रत/ कंपनीबाबत Memorandum of Association (MOA) |
| १२ | संस्थेच्या व्यवस्थापन समिती सदस्यांचीं माहिती/<br>कंपनीच्या संचालक मंडळाची (बोर्ड ऑफ डायरेक्टरची) यादी | | अद्ययावत पीटीआर उतारा (शेडयुल १ ची प्रत)<br>अद्ययावत नसल्यास त्याआधीचा पीटीआर उतारा व त्यातील कार्यकारीणीत बदल झाला नसल्याचे संस्थेच्या अध्यक्ष व सचिवांचे रु. १००/- मुल्याच्या मुद्रांकावर (Stamp Paper) प्रतिज्ञापत्र |
| १३ | संस्थेच्या व्यवस्थापन समितीमध्ये वाद आहेत किंवा कसे ?<br>संस्थेच्या बाबतीत न्याय प्रविष्ठ प्रकरण आहे किंवा कसे ? | | यासंदर्भात संस्थेचे अध्यक्ष/ सचिव यांचे रु. १००/- मुल्याच्या मुद्रांकावर (Stamp Paper) प्रतिज्ञापत्र |
| १४ | शाळा ज्या जमीनीवर आहे त्या जागेचा तपशील<br>अ) जागा संस्थेच्या मालकीची आहे काय ? असल्यास, | | जागेचे क्षेत्रफळ (चौरस मीटर किंवा हेक्टर व आर मध्ये)<br>अ) १) जमीन संस्थेच्या मालकीची असल्यास ७/१२ चा अद्ययावत उतारा |

| | | | |
|---|---|---|---|
| | ब) जमीन/ इमारत भाडेकरारावर (लिज) आहे काय ? असल्यास, किती वर्षांसाठी ?<br>क) जमीन शासनाकडून मंजूर केली/ खरेदी केली असल्यास<br>ड) जमीन शासनाकडून किंवा शासन अंगीकृत प्राधिकरणाकडून भाडेकरारावर घेतली असल्यास | | किंवा<br>२) इमारतीसंबंधी ८ अ/ इंडेक्स २ चा उतारा अथवा मालमत्तापत्रक<br>ब) जमीन/ इमारत भाडे करारावर (लीज) असल्यास नोंदणीकृत भाडेकराराची प्रत<br>क) मंजूरी आदेशाची किंवा खरेदीपत्राची प्रत<br>ड) मंजूरी आदेशाची किंवा भाडेकराराची प्रत |
| १५ | संस्थेची/ कंपनीची आर्थिक स्थिती दर्शविणारा तपशील<br>अ) बँकेचे नाव व खाते क्रमांक<br>ब) सदर खात्यावरील शिल्लक रक्कम<br>क) ठेव स्वरुपातील निधी<br>ड) इतर निधी (असल्यास) | | अ) अद्ययावत बँक स्टेटमेंट किंवा पासबुकची प्रत किंवा,<br>ब) मुदत ठेव पावती किंवा,<br>क) शिल्लक निधीची पावती |
| १६ | संस्थेचे दरवर्षी लेखा परिक्षण करण्यात येते काय ?/<br>कंपनीचे आयकर विवरणपत्र | | संस्थेचे मागील तीन वर्षांचे लेखा परिक्षण अहवाल/<br>कंपनीचे मागील तीन वर्षांचे आयकर विवरणपत्र. |
| १७ | शाळा ज्या इमारतीमध्ये सुरु आहे त्याच इमारतीत अन्य संस्थेची किंवा अन्य बोर्डास संलग्न असलेली शाळा सुरु आहे काय ? | | यासंदर्भात संस्थेचे अध्यक्ष/ सचिव यांचे रु. १००/- मुल्याच्या मुद्रांकावर (Stamp Paper) प्रतिज्ञापत्र |
| १८ | शासनाने विहीत केलेल्या छाननी शुल्काचा भरणा केला आहे काय ? | | चलनाची पावती |
| १९ | शाळेमध्ये सर्व आवश्यक भौतिक सोयीसुविधा उपलब्ध आहेत काय ? | | भौतिक सोयीसुविधा उपलब्धते बाबत खालील सुविधांचे फोटो<br>१) शाळेची पक्की इमारत (बांधकाम पूर्ण असलेली) (R.C.C. Building)<br>२) वर्गखोल्या (Class Rooms)<br>३) विज्ञान प्रयोगशाळा (Science Laboratory)<br>४) ग्रंथालय (Library) |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | ५) संगणक प्रयोगशाळा (Computer Laboratory)<br>६) पिण्याचे पाणी (Drinking Water)<br>७) मुलांचे व मुलींचे स्वतंत्र स्वच्छतागृह (Toilets for Boys and Girls)<br>८) क्रीडांगण (Play Ground)<br>९) रॅम्प (Ramps)<br>१०) अग्निसुरक्षा व्यवस्था (Fire safety Equipment) |

ठिकाण:- स्वाक्षरी

दिनांक:- संस्था सचिव/अध्यक्ष/मुख्याध्यापक